प्रवासभत्ता देयक
तिकोटाचा क्रमांक, दिनांक इत्यादी
तपशील सादर करण्याबाबत---

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
शासन निर्णय क्रमांकः प्रवास-११०१/प्र.क्र.४८/सेवा-५,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२, दिनांक : ६ ऑक्टोबर,२००२

**पहाः-** **(१)** शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः टीआरए-१०७५/सेवा-५, दि. १ नोव्हेंबर, १९७५.
**(२)** शासन परिपत्रक,वित्त विभाग, क्रमांकः टीआरए-१०८१/सीआर-९०९/एसईआर-५, दि. १८ जून, १९८१.
**(३)** शासन परिपत्रक,वित्त विभाग, क्रमांकः प्रवास-११८७/७३/सेवा-५,दि. २ फेब्रुवारी, १९८७.

**शासन निर्णय**

वरील (१) आणि (३) येथील आदेशांतील तरतुदींनुसार शासकीय कर्मचा-यांनी रेल्वेच्या प्रथम वर्गाने किंवा प्रथम वर्गाच्या भाडयापेक्षा अधिक प्रवासभाडे देऊन अन्य वर्गाने प्रवास केला असेल तर प्रवासभत्ता देयकात तिकीट क्रमांक, दिनांक आदी तपशील नमूद करणे आवश्यक आहे. तसेच वरील (२) येथील आदेशातील तरतुदींनुसार शासकीय समितीच्या कामकाजानिमित्त अशासकीय सदस्याने प्रथम वर्गाने केलेल्या रेल्वे प्रवासाच्या प्रकरणी त्यास प्रवासभत्ता मंजूर करण्यासाठी त्यांनी प्रथम वर्गाच्या तिकीटाचा क्रमांक, दिनांक इ. तपशील देण्याची आवश्यकता नाही.

२. शासकीय कर्मचारी आणि अशासकीय सदस्य यांनी रेल्वेने केलेल्या प्रवासाच्या प्रकरणी विहीत करण्यात आलेल्या वरील तरतूदींचा पुनर्विचार करण्याचा प्रश्न काही काळ शासनाच्या विचाराधिन होता. यासंदर्भात विचार करुन शासन आता खालीलप्रमाणे आदेश देत आहे:

**(अ) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः टीआरए-१०७५/सेवा-५, दि. १ नोव्हेंबर, १९७५, शासन परिपत्रक,वित्त विभाग, क्रमांकः टीआरए-१०८१/सीआर-९०९/एसईआर-५, दि. १८ जून, १९८१ आणि शासन परिपत्रक,वित्त विभाग, क्रमांकः प्रवास-११८७/७३/सेवा-५, दि. २ फेब्रुवारी, १९८७ अन्वये प्रसृत करण्यात आलेले आदेश रद्दबातल समजण्यात यावेत.**

**(ब) शासकीय कर्मचा-यांनी ज्या वेळी रेल्वेच्या प्रथम वर्गाने वा कोणत्याही वातानुकूल वर्गाने प्रवास केला असेल, त्या वेळी प्रवासभत्ता देयकात तिकिट क्रमांक, दिनांक इत्यादी तपशील** नमूद करणे **आवश्यक असेल.**

३. अशासकीय सदस्यांचे समाजातील स्थान, त्यांच्या मागे असलेले सामाजिक कार्याचे अनेक व्याप इ. बाबी लक्षात घेऊन शासन असेही आदेश देत आहे की **समिती/मंडळ/आयोग वगैरेंवर नेमलेल्या अशासकीय सदस्यानी,**

**त्यांना रेल्वेच्या अनुज्ञेय असलेल्या कोणत्याही वर्गाने केलेल्या प्रवासाच्या, प्रवासभत्ता मंजूर करण्यासाठी, प्रवासभत्ता देयकात तिकीट क्रमांक, दिनांक आदी तपशील देण्याची आवश्यकता नाही.**

४. हे आदेश दि. १ नोव्हेंबर ,२००२ पासून व त्यानंतर सुरु होणा-या प्रवासांच्या प्रकरणी लागू करण्यात यावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

**वा.व.सावंत**
शासनाचे उपसचिव

प्रति,

- महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
- महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
- महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
- महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
- अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
- निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
- राज्यपालांचे सचिव,
- मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
- उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
- सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
- मंत्रालयीन सर्व विभाग,
- सर्व विभागीय आयुक्त,
- मंत्रालयाच्या सर्व विभागाखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
- *प्रबंधक, उच्च न्यायालय (मुळ शाखा), मुंबई,
- *प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
- *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
- *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
- *प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
- सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग),खोली क्र. २६१,नॉर्थ ब्लॉक ,नवी दिल्ली,
- संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
- मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,
- उपमुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
- जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
- सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
- सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
- सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
- वित्त विभागातील सर्व कार्यासने,
- निवड नस्ती, वित्त विभाग /सेवा-५,
- *सदरहू शासन निर्णयाची प्रत www.maharashtra.gov.in व finance.mah.nic.in या संकेतस्थळां(website)वरही उपलब्ध आहे.*

*पत्राद्वारे.

एच-887(15000+15-10-02)अ